**परिवहन आयुक्त कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई या कार्यालयाची थकित विद्युत देयके अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१०२०/प्र.क्र.१९९/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ११ मार्च, २०२५

**वाचा :-**

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबा / बांद्रा /का-१० (१) / २०२४ जा.क्र.१४०७१,दि.१३.१२.२०२४.

**प्रस्तावना :-**

परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई हे कार्यालय प्रशासकीय इमारत, डॉ. आंबेडकर उद्यानाजवळ, वांद्रे (पूर्व), येथील ३ ऱ्या मजल्यावरील ५६०० चौ. फूट जागेत व ४ थ्या मजल्यावरील १२००० चौ. फूट जागेत कार्यरत होते. जनहित याचिका क्र.१५६/२०११ व त्यामध्ये समाविष्ट इतर याचिकांवर (४०/२०१२) मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार परिवहन आयुक्त कार्यालयाची प्रशासकीय इमारत डॉ. आंबेडकर उद्यानाजवळ, वांद्रे (पूर्व) येथील ३ ऱ्या मजल्यावरील ५६०० चौ. फूट जागा सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. शाकाजा-**१११६**/प्र.क्र.**९३/२०१६/२२**,दि. ०२.०८.२०१६ अन्वये अतिरिक्त जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच या कार्यालयासाठी वाटप करण्यात आली. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने परिवहन आयुक्त यांचे कार्यालय फोर्ट एमटीएनएल इमारत क्र. १ मधील ७ वा मजला व फोर्ट एमटीएनएल इमारत क्र. २ मधील ५ वा मजला येथील जागा भाड्याने घेऊन सदर जागेत माहे डिसेंबर, २०१९ पासून स्थलांतरीत करण्यात आले आहे.

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. शाकाजा-१११६/प्र.क्र.९३/२०१६/२२, दि. २४.०६.२०२० अन्वये प्रशासकीय इमारत, डॉ. आंबेडकर उद्यानाजवळ, वांद्रे (पूर्व) येथील ४ थ्या मजल्यावरील १२००० चौ. फुट जागा परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या ताब्यात ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर जागेत नूतनीकरणाचे काम सुरु असल्याने तसेच प्रशासकीय कारणास्तव सदर जागेचे विद्युत देयक अदा करता आलेले नाही. उप अभियंता, बांद्रा विद्युत उपविभाग, सा.बां. विभाग, मुंबई यांनी दि. ११.११.२०२४ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार विद्युत जोडभरात वाढ झाल्यामुळे मे. अदानी इलेक्ट्रिसीटी यांच्याकडून अतिरिक्त विद्युत जोडभार मंजूर करुन घेण्याकरिता विहित नमुन्यातील फॉर्म भरुन परस्पर मे. अदानी इलेक्ट्रिसीटी, मुंबई उपनगर वांद्रे यांचेकडे जमा करण्यात आलेला आहे. सदर फॉर्म भरतेवेळी मे. अदानी इलेक्ट्रिसीटी यांनी एप्रिल, २०२१ ते नोव्हेंबर, २०२४ या कालावधीतील रु. २,७७,७२०/- इतकी रक्कम अदा करणे बाकी असल्याचे कळविले आहे. त्यानुसार परिवहन आयुक्त,

महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून परिवहन आयुक्त कार्यालय, प्रशासकीय इमारत, ४ था मजला, डॉ. आंबेडकर उद्यानाजवळ, वांद्रे (पूर्व), मुंबई या कार्यालयाच्या थकित विद्युत देयकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

परिवहन आयुक्त कार्यालय, प्रशासकीय इमारत, ४ था मजला, डॉ. आंबेडकर उद्यानाजवळ, वांद्रे (पूर्व), मुंबई या कार्यालयाची माहे एप्रिल, २०२१ ते नोव्हेंबर, २०२४ या कालावधीतील रु.२,७७,७२०/- (रु. दोन लाख सत्त्याहत्तर हजार सातशे वीस फक्त) इतक्या रकमेची थकित विद्युत देयके अदा करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. "बी-३, मुख्य लेखाशीर्ष : २०४१, वाहनावरील कर, (००) (००१) संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१)(०१) आस्थापना (२०४१००१८) (०६) वीज, पाणी व दूरध्वनी या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग -१, अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३१११२३६१६७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.03.11 12:37:54 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती (परि-४)